**महाराष्ट्र जलसंधारण महामंडळाकरिता नाबार्ड अर्थसहाय्य अंतर्गत आरआयडीएफ कर्जाव्दारे वितरण (सन २०२५-२६)**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र. मजम-२०२५/प्र.क्र.५५/जल-३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४जुन, २०२५

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थसं-३, दि.०७ एप्रिल, २०२५.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. म.ज.स.म.ले-१/४३६, दि. १६ एप्रिल, २०२५.

**<u>प्रस्तावना</u> :-**

महाराष्ट्र जलसंधारण महामंडळाकरीता नाबार्ड अर्थसहाय्यित "ग्रामीण पायाभूत विकास निधी" (RIDF) योजनेंतर्गत रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील जलसंधारणांच्या योजना /कामे पुर्ण करण्यासाठी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र. झेडएच-५, मुख्य लेखाशिर्ष ४७०२-ए४४९ नाबार्ड अर्थसहाय्यित "ग्रामीण पायाभूत विकास निधी" (RIDF) रु. १००.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. महाराष्ट्र जलसंधारण महामंडळामार्फत रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील (१) ल.पा. योजना सावडाव-२, (२) ल.पा. योजना नावळे, (३) ल.पा. योजना भोवडे (तिटकली), (४) ल.पा. योजना आंबवली व (५) .पा. योजना पालगड (मळेकरवाडी) या पाच जलसंधारणाच्या योजनांसाठी झालेल्या खर्चास रु. १००.०० कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सदर उपलब्ध झालेला निधी महामंडळाला वितरीत करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>निर्णय</u> :-**

महाराष्ट्र जलसंधारण महामंडळाकरिता नाबार्ड अर्थसहाय्य अंतर्गत आरआयडीएफ कर्जाव्दारे स्वरुपात रुपये १००.०० कोटी (<u>अक्षरी रुपये शंभर कोटी फक्त</u>) इतका निधी वितरित करण्यासाठी याव्दारे, शासनाने मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी कोषागारातून आहरीत करुन व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर यांच्या नांवे वितरित करण्यासाठी प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक-झेडएच-५,</u>**
प्रधान लेखाशिर्ष ४७०२
(०१)(०४) नाबार्ड अर्थसहाय्य अंतर्गत आरआयडीएफकर्जाव्दारे ० ते ६०० हेक्टर सिंचन क्षमतेची कामे
(कार्यक्रम) (४७०२ ए४४९),
५३, मोठी बांधकामे

४. प्रस्तुत निधीच्या विनियोगासाठी वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकांमधील सूचनांचे अनुपालन करण्यात यावे.

५. प्रस्तुत वरीलप्रमाणे उपलब्ध होणा-या निधीमधून महामंडळाच्या नियोजनानुसार भूसंपादनाच्या प्रकरणांचे दायित्व अदा करण्यात यावे. याप्रमाणे भूसंपादनावार होणा-या खर्चाच्या हिशेब करुन निधी शिल्लक रहात असल्यास तशी माहिती शासनास देण्यात यावी

६. निधी वितरणासंदर्भात शासनाच्या निदेशांचे अनुपालन करण्यात आले नाही किंवा काही भंग झाल्यास व त्यामुळे भविष्यात काही तक्रारी किंवा न्यायालयीन प्रकरणे उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक व मुख्य लेखा व लेखापरीक्षा अधिकारी (CAFO), महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद यांची राहील.

७. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०४१५२७०१५९२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2025.06.04 15:27:45 +05'30'

**( प्र. नि. पाटील )**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**१.** व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
**२.** अपर आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग,प्रादेशिक क्षेत्र, पुणे /नागपूर
**३.** प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, (सर्व)
**४.** मुख्य लेखा व लेखापरीक्षा अधिकारी (CAFO), महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
**५.** महालेखापाल, ( लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
**६.** अधिदान व लेखा अधिकारी / निवासी लेखापरीक्षा, नागपूर
**७.** वरीष्ठ कोषागार अधिकारी, लेखाकोष भवन, छत्रपती संभाजीनगर
**८.** जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
**९.** नियोजन विभाग (का.१४३४), मंत्रालय, मुंबई
**१०.** वित्त विभाग ( व्यय-१५ ) / साऊ /अर्थबळ/मंत्रालय, मुंबई
**११.** कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक जल-११, मृद व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.
**१२.** निवडनस्ती/कार्यासन जल-३.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. विरोधी पक्षनेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता (विधान सभा) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
५. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधित मृद व जलसंधारण उपविभागिय अभियंता).
६. प्र.स., मृद व जलसंधारण यांचे स्वीय सहायक.
७. आयुक्त, मृद व जलसंधारण, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर